वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखाली २० अस्थायी पदांना सन २०१७-१८ या वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.९४/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१७.

पहा :-

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०१६/प्र.क्र.१११/फ-३, दिनांक २४ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक ९ मे, २०१६.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२४/१६-१७/२०९४; दिनांक ३ फेब्रुवारी, २०१७.

**शासन निर्णय :-**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदे दिनांक २८.२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक १ अन्वये यापूर्वी मान्यता दिली होती. सदर २० अस्थायी पदांना आता दिनांक २८.२.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

२. आता **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार २० अस्थायी पदे दिनांक १.३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर २० अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालवधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर २० अस्थायी पदे वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती मान्य केलेल्या आकृतीबंधातील २५०२५ पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

३. या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०२.२०१७ च्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२३१२५८०६४३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bhaskar Kacharu Bansode

Digitally signed by Bhaskar Kacharu Bansode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4449e6ba807d428f12cdf5421c14073d9bbfe99f719cded6503ad69d99320695, cn=Bhaskar Kacharu Bansode
Date: 2017.02.27 18:03:29 +05'30'

**(भा.क.बनसोडे)**

कार्यासन अधिकारी

महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. सर्व विभागीय आयुक्त.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
४. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ कोल्हापूर/औरंगाबाद.
५. वनजमाबंदी अधिकारी, भोर /औरंगाबाद/सावंतवाडी.
६. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | पदनाम. | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशील |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ / कोल्हापूर-१/ नागपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (कोल्हापूर-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ५ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ६ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ७ | चेनमन | २ | (ठाणे-२) |
| ८ | चपराशी | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)-१) |
| ९ | जीपचालक | १ | (पुणे-१) |
| १० | वाहनचालक | १ | (नागपूर-१) |
| ११ | पहारेकरी | १ | (नागपूर-१) |
| एकूण | | **२० पदे** | |